"वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" (योजनेत्तर) या योजनेतील २४४ अस्थाई पदांना सन २०२०-२१ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४९/फ-९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.४१/१८-१९/१७७८, दिनांक १८.२.२०२०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४९/फ-९, दि.३०.०३.२०२०
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२०
६. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.०१/१९-२०/५८, दिनांक ०७.०९.२०२०

**शासन निर्णय :-**

मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ व ६ अन्वये "वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत २४४ अस्थाई पदे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

वित्त विभाग संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये **"वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत २४४ अस्थाई पदांना सन २०२०-२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत** चालू ठेवण्याबाबत मुदतवाढ देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.५ येथील वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ३१.०८.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु,ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या **सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.**

त्यानुसार **"वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत २४४ अस्थाई पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत** चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरण पत्रानुसार

शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ संदर्भ क्र.२ शासन निर्णयान्वये निश्चित केलेला आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर पदांवर होणारा खर्च, मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१-वनीकरण, १०५-वनोत्पादन, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजना, (०१)(०३) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (इमारतीचे लाकूड) (२४०६ ०४७२) ०१ वेतन या लेखा शिर्षाखाली सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००११५३०१४४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.10.01 15:32:00 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
कक्ष अधिकारी (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), मुंबई / नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट व अमरावती.
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ / चंद्रपूर / नागपूर / अमरावती / गडचिरोली/कोल्हापूर वनवृत्त.
८. वनसंरक्षक, वाहतूक व विपणन विभाग बल्लारशहा.
९. उपवनसंरक्षक यवतमाळ, पांढरकवडा, नागपूर, ब्रम्हपूरी, मध्य चांदा, बुलढाणा, पूसद, वणी, कोल्हापूर, सातारा, सावंतवाडी, वर्धा, भंडारा, गोंदिया, पश्चिम मेळघाट, चिखलदरा, पूर्व मेळघाट, अमरावती वन विभाग
१०. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११. वित्त विभाग, व्यय-१०/वित्तिय सुधारणा- १ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. कार्यासन अधिकारी फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१३. कक्ष अधिकारी ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१४. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. (निवडनस्ती).

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४९/फ-९, दिनांक ३० सप्टेंबर, २०२०**

**सोबतचे विवरणपत्र**

**(दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदांची संख्या** |
|---|---|---|
| १ | प्रकाष्ठ निष्कासन अधिकारी | १ |
| २ | कार्यशाळा अधिक्षक | ० |
| ३ | सहा.वनसंरक्षक | ३ |
| ४ | वनक्षेत्रपाल | ३ |
| ५ | वनपाल | ४५ |
| ६ | वनरक्षक | ८३ |
| ७ | सहायक यांत्रिकी | २ |
| ८ | भांडारपाल | २ |
| ९ | लंथेमन | १ |
| १० | विजतंत्री | ० |
| ११ | यांत्रिकी | ५ |
| १२ | भांडार लिपीक | १ |
| १३ | लेखापाल | ० |
| १४ | लोहार | १ |
| १५ | स्वयंत्र विज यंत्रक | ० |
| १६ | सहाय्यक संघता | ० |
| १७ | जोडारी | २ |
| १८ | लिपीक | १ |
| १९ | मदतनीस | २ |
| २० | कर्मशाळा मदतनीस | ० |
| २१ | शिपाई | ० |
| २२ | पहारेकरी | ५ |
| २३ | जीप चालक ट्रक / ट्रॅक्टर चालक | ३३ |
| २४ | चौकीदार | २ |
| २५ | ट्रॅक्टर स्वच्छक | १५ |
| २६ | मालमोटार चालक | १२ |
| २७ | मालमोटार स्वच्छक | २० |
| २८ | सांधाता | १ |
| २९ | खलाशी | १ |
| ३० | महावत | २ |
| ३१ | चाराकटर | १ |
| | **एकूण:-** | **२४४** |

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.10.[illegible] +05'30'

**( सु. ल. काठोळे )**

कक्ष अधिकारी (वने)

महसूल व वन विभाग